**सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरीता वनीकरणाद्वारे सागरी किनारपट्टीचे संरक्षण (२४०६-८६०४) लेखाशीर्षांतर्गत अनुदान वितरण करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः साववि-२०२१/प्र.क्र. ४२/फ-११**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २३.०२.२०२२

वाचा:-

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२१/प्र.क.४८/अर्थ-३, दि.६.४.२०२१
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्र.क.४८/अर्थ-३, दि.२४.६.२०२१
३) प्रधान मुख्य वनसंरक्षक, (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) म.रा. नागपूर, यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/अ.स./प्र.क्र.०९/२०२१-२२,दि. ६.८.२०२१
४) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) म.रा. नागपूर, यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/अ.स./नबाप्र/प्र.क्र.२६/१८२/२०२१-२२,दि. ११.०८.२०२१
५) महसूल व वन विभाग, शासन निर्णय दि. ७.१०.२०२१.
६) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्र.क.४८/अर्थ-३, दि. १४.१०.२०२१
७) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-१/पी/यो/नबाप्र/प्र.क्र.२६/४९०/२०२१-२२, दि. ०५.०१.२०२२.
८) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२१/प्र.क.४८/अर्थ-३, दि. २८.०१.२०२२.

प्रस्तावना :-

महाराष्ट्र राज्याला ७२० कि.मी. लांबीचा समुद्र किनारा लाभलेला आहे. दरवर्षी पावसाळ्यात समुद्राच्या पाण्याच्या लाटांमुळे किंवा भरतीच्यावेळी येत असलेल्या उधानामुळे समुद्र किनाऱ्याजवळील वालुकामय क्षेत्राची बऱ्याच मोठ्या प्रमाणावर धूप होते व वाळू वाहून जाते. वाळू वाहून गेल्याने जास्त भरती आल्यास समुद्र किनाऱ्यालगतची घरे, वाड्या, नारळ व पोफळीच्या बागा तसेच काठावरील भूभागाची मोठ्या प्रमाणावर धूप होऊन, मोठ्या प्रमाणावर आर्थिक नुकसानीची झळ प्रत्येक वर्षी समुद्र किनाऱ्यावरील गावांना लागत असते. या सर्व बाबी लक्षात घेऊन समुद्र किनाऱ्यावरील धूप कमी करण्यासाठी समुद्र किनारी सुरू प्रजातीची लागवड करणे, त्सुनामी सारख्या लाटांची तीव्रता कमी करून जीवित व मालमत्तेचे आर्थिक नुकसान टाळणे, सुरू प्रजातीची वने तयार करून पर्यटकांना आकर्षित करणे, ग्रामपंचायतीच्या उत्पन्नात वाढ करणे व ग्रामीण भागात रोजगाराच्या संधी निर्माण करणे ही या योजनेची उद्दिष्टे आहेत.

२. सन २०२१-२०२२ या आर्थिक वर्षात सदर योजनेंतर्गत एकूण ५.०० हे. क्षेत्रावर पुर्व पावसाळी व प्रथम वर्षीय कामे करण्याकरिता रु. ९.६८ लक्ष निधी इतक्या अनुदानाची आवश्यकता असल्याचे प्रधान मुख्य वनसंरक्षक ( सामाजिक वनीकरण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी कळविले आहे.

३. कोविड-१९ च्या महामारीमुळे सन २०२१-२२ या वित्तीय वर्षात होणाऱ्या अर्थव्यवस्थेवरील परिणामाबाबत वित्तीय उपाययोजना, शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक २४.६.२०२१ अन्वये निर्गमित करण्यात आलेल्या आहेत. सदर शासन निर्णयानुसार सन २०२१-२२ च्या अर्थसंकल्पीय निधीच्या ६० टक्के निधी उपलब्ध होईल या सूत्राच्या अधिन राहून विभागाने नियोजन करावयाचे आहे. सदर शासन निर्णयाच्या अनुषंगाने प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र.३ च्या पत्रान्वये विभागातील योजनांकरिताचा नियतव्यय ६० टक्केच्या मर्यादेत निश्चित करून, त्याबाबतचा तपशील सादर केलेला आहे. त्यानुसार सन २०२१-२२ करिता वनीकरणाद्वारे सागरी किनारपट्टीचे संरक्षण (२४०६-८६०४) या योजनेसाठी अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या रू. २०.०० लक्ष या नियतव्ययापैकी रू.१०.०० लक्ष नियतव्यय निश्चित केलेला आहे.

४. वित्त विभागाच्या संदर्भ क्र. १, २, ६ व ८ चे परिपत्रक व शासन निर्णयान्वये सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाच्या पहिल्या ९ महिन्यांच्या कालावधीसाठी (डिसेंबर, २०२१ पर्यंत) अनिवार्य खर्चाच्या निधी वितरण/खर्चाची मर्यादा ७५ % इतकी विहीत करण्यात आली आहे. मात्र २१-पुरवठा व सामूग्री, २६-जाहिरात व प्रसिध्दी, ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर), ३२-अंशदाने व ३३-अर्थसहाय या बाबींसाठी वित्त विभागाची मान्यता घेणे आवश्यक राहील. तसेच कार्यक्रम खर्चासाठी ५०% इतक्या मर्यादेत निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे. मात्र कार्यक्रम खर्चाची वर्ष अखेरची मर्यादा ६०% इतकीच राहील, असे नमूद केले आहे.

५. महसूल व वन विभागाच्या दि. ७.१०.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये सदर योजनेंतर्गत रु. १.८५ लक्ष इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. सबब, सदर योजनेंतर्गत ६० टक्केच्या मर्यादेत निश्चित करण्यात आलेल्या रु. १०.०० लक्ष नियतव्ययापैकी उर्वरित रु. ८.१५ लक्ष निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

सन २०२०-२१ या वित्तीय वर्षात वन विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या वनीकरणाद्वारे सागरी किनारपट्टीचे संरक्षण (२४०६-८६०४) योजनेकरिता रु. २०.०० लक्ष नियतव्यय अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे. वनीकरणाद्वारे सागरी किनारपट्टीचे संरक्षण (२४०६ ८६०४) या योजनंतर्गत ६० टक्केच्या मर्यादतेत निश्चित करण्यात आलेल्या रू. १०.०० लक्ष नियतव्ययापैकी रू. ८.१५ लक्ष निधी वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्याकडे सुपूर्त करण्यात येत आहे. या योजनेंतर्गत घ्यावयाच्या कामाची अंमलबजावणी कृती आराखड्याप्रमाणे, विहित कार्यपध्दतीनुसार आणि ठरविलेल्या मुदतीत करण्याबाबत दक्षता घ्यावी. याबाबत सविस्तर मार्गदर्शक सूचना क्षेत्रीय अधिकाऱ्यांना द्याव्यात आणि अंमलबजावणीबाबत वेळोवेळी आढावा घ्यावा. सदर निधी मंजूर असलेल्या योजनांवरच खर्च करण्यात यावा. मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची नियंत्रक अधिकाऱ्यांनी दक्षता घ्यावी. सदर योजनेतंर्गत प्रस्तावित कामांना तांत्रिक व प्रशासकीय मंजूरी देण्यात आली असल्याची खात्री करूनच निधी वितरित करण्यात यावा.

३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), हे वर्ष २०२१-२२ मध्ये सदर योजनेंतर्गत वितरीत केलेल्या निधीबाबत उपयोगिता प्रमाणपत्र ७ दिवसांत शासनास सादर करतील.

४. सदर निधी वितरित करण्यापूवी प्रधान मुख्य वनसंरक्षक ( अर्थसंकल्प, नियोजन व विकास ), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सदर योजनेसाठी सन २०२१-२२ करिता वितरित केलेला निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली व्यतिरिक्त अन्यत्र ठिकाणी वळती केला नसल्याची खात्री करावी.

५. सदर निधी खर्च करताना वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक १ येथील शासन परिपत्रकातील तरतूदी व महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियम पुस्तिका, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका यामध्ये उल्लेख केलेल्या तरतुदी व वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे पालन करण्यात यावे.

६. जिल्हानिहाय वितरीत तरतुदीची माहिती व राबविण्यात आलेल्या कार्यक्रमाची/झालेल्या खर्चाचा तपशील शासनास दरमहा विहित प्रपत्रात सादर करण्यात यावा. तसेच योजनेचे संनियंत्रण प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्यामार्फत व्हावे.

७. सदर योजने अंतर्गत होणारा खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली सन २०२१-२२ च्या मंजूर अर्थसंकल्पीत निधीतून खर्ची टाकण्यात यावा.

**मागणी क्र. सी-०७**

**२४०६, वनीकरण व वन्यजीवन,**

**वनीकरण, १०२ सामाजिक क्षेत्रीय वनीकरण**

**(०३) वनीकरणाद्वारे सागरी किनारपट्टीचे संरक्षण (२४०६-८६०४)**

**३३-अर्थसहाय्य**

८. सदर शासन निर्णय संदर्भ क्रमांक १, २, ६ व ८ येथील वित्त विभागाच्या शासन परिपत्रक/शासन निर्णयानुसार विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. अनौसं/५१/व्यय-१० दि. ९.०२.२०२२ अन्वये प्राप्त सहमतीनूसार निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०२२३११५२११३९१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

RAVIKIRAN SABAJI GOVEKAR

Digitally signed by RAVIKIRAN SABAJI GOVEKAR
DN: c=IN, o=Personal,
pseudonym=bb348b74c34d5cdc104457bb077cbbab2753fda99613688793f8ffb2d4595af5,
2.5.4.20=d399ba42648ff6007bc88b201ae47aa7d8a80a09e22cffd4c08887e4e01ce080, postalCode=416519, st=MAHARASHTRA,
serialNumber=b752370b557d0a3e58b4b069230bc54f6a13d04798d2ee7a3f1c7dcc5655271c, cn=RAVIKIRAN SABAJI GOVEKAR
Date: 2022.02.23 11:53:45 +05'30'

**(रविकिरण गोवेकर)**
**मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)**

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख),महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (सामाजिक वनीकरण) , महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. मुख्य वनसंरक्षक/ वनसंरक्षक (प्रादेशिक) (११ वृत्त)
५. वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण (६ वृत्त)
६. उप वनसंरक्षक (प्रा) (सर्व)/ विभागीय वन अधिकारी (प्रा)/ उपविभागीय वन अधिकारी (प्रा)
७. विभागीय वन अधिकारी,सामाजिक वनीकरण (सर्व जिल्हे)
८. महालेखापाल, (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ व २ , मुंबई व नागपूर,
९. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,

१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई ४०० ०३२.
११. निवासी परिक्षा लेखा अधिकारी,मुंबई
१२. वित्त विभाग,व्यय-१०,अर्थसंकल्प-०६  मंत्रालय, मुंबई-३२
१३. कार्यासन अधिकारी, फ-२,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१४. कार्यासन अधिकारी, ब-१,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१५. उप सचिव/अवर सचिव(सर्व), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१६. निवडनस्ती फ-११.